अर्थसंकल्पीय तरतुदींचे पुनर्विनियोजन
मुख्य लेखाशीर्ष “२२१७ नगरविकास”

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः विघयो२०१४/प्र.क्र.९५/नवि-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
तारीख: २७.३.२०१५

**प्रस्तावना:**

सामाजिक न्याय विभागाने, २०१४-१५ या वर्षाकरिता, या विभागामार्फत अनुसूचित जाती उपयोजनेअंतर्गत राबविण्यात येणा-या नागरी दलित वस्ती सुधारणा योजना या जिल्हास्तरीय योजनेसाठी रु.३५८१९.२४ लक्ष इतका नियतव्यय उपलब्ध करुन दिला आहे. सदर नियतव्ययापैकी रु.१७६११.२७ लक्ष इतका नियतव्यय महानगरपालिकांकरिता तर रु.१८२०७.९७ लक्ष इतका नियतव्यय नगरपरिषदांकरिता देण्यात आला आहे. महानगरपालिकांकरिता देण्यात आलेला नियतव्यय लेखाशीर्ष २२१७ ११४१ खाली तर नगरपरिषदांकरिता देण्यात आलेला नियतव्यय लेखाशीर्ष २२१७ ८०७५ खाली अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

महानगरपालिकांकरिता देण्यात आलेल्या नियतव्ययापैकी रु.१ कोटी इतका नियतव्यय यवतमाळ जिल्हयातील महानगरपालिकांसाठी देण्यात आला आहे. यवतमाळ जिल्हयात महानगरपालिका नसल्यामुळे सदर नियतव्यय त्याच जिल्हयातील नगरपरिषदांसाठी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशीर्ष २२१७-नगर विकास, १९१- महानगरपालिकांना सहाय,(००)(२५) नागरी भागातील महानगरपालिका क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे (विशेष घटक योजना) (२२१७११४१) या लेखाशिर्षाखालील ३१, सहायक अनुदाने(वेतनेत्तर) या उद्दिष्टामधून रु. रु.१,००,००,०००/-(रुपये एक कोटी फक्त) इतक्या तरतुदीचे याच मुख्यलेखाशिर्षाखालील १९२ नगरपरिषदांना सहाय, (००)(६२)- नागरी भागातील नगरपरिषदा क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे (विशेष घटक योजना) (२२१७ ८०७५) या लेखाशिर्षाखालील ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली सोबतच्या विवरणपत्र क्र.१ व २ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पुनर्विनियोजन करण्यास शासन मान्यता देत आहे.

संबंधित अधिका-यांनी विवरणपत्र क्र.१ व २ मधील स्तंभ क्र.५ खाली दर्शविण्यात आलेल्या पुनर्वितरणानंतरच्या सुधारित तरतुदींची नोंद घेऊन सदर निधीच्या वितरणाबाबतची पुढील कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय वित्त विभागाने अनौ.सं.क्र.४१/व्यय-३, दि.२७.१.२०१५ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२३१६०००६११२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajesh Hanmant Padhye

Digitally signed by Rajesh Hanmant Padhye
DN: CN = Rajesh Hanmant Padhye, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Urban Development Department
Date: 2015.03.27 18:23:12 +05'30'

प्रत,

१) महालेखापाल,(लेखा व हकदारी)-१ मुंबई
२) महालेखापाल, (लेखा व हकदारी)-२ नागपूर
३) महालेखापाल,(लेखापरिक्षा)-१ मुंबई
४) महालेखापाल, (लेखापरिक्षा)-२ नागपूर
५) अप्पर मुख्य सचिव(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) अप्पर मुख्य सचिव(वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
९) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०) कक्ष अधिकारी(नवि-१६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११) निवडनस्ती(नवि-४)

(शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. विघयो २०१४/ / प्र.क्र. ९५/ नवि-४, दि. २७.३.२०१५ चे सहपत्र)

विवरणपत्र क्र. १

वित्तीय वर्ष २०१४-१५ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

(रूपये हजारात)

| अ.क्र. | पुनर्वितरणामुळे घट (-) झालेले लेखाशिर्ष (मुख्य/उप/गौण व तपशीलवार | पुनर्वितरणाचे वेळी उपलब्ध असलेले मंजूर अनुदान | पुनर्वितरणामध्ये घट होणारी रक्कम(-) | पुनर्वितरणानंतर शिल्लक अनुदान | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | मागणी क्र.एफ-२ मुख्य लेखाशीर्ष २२१७ नगर विकास, १९१-महानगरपालिकांना सहाय, (००)(२५) नागरी भागातील महानगरपालिका क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे(विशेष घटक योजना) (२२१७ ११४१) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) (दतमत) | १७६,११,२७ | १,००,०० | १७५,११,२७ | ना.द.व.सु.योजनेखाली महानगरपालिकांकरिता करण्यात आलेल्या तरतुदीपैकी रु.१ कोटी इतकी तरतूद यवतमाळ जिल्हयातील महानगरपालिकांसाठी आहे. यवतमाळ जिल्हयात महानगरपालिका नसल्यामुळे सदर तरतूद त्याच जिल्हयातील नगरपरिषदांसाठी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याकरिता मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशीर्ष २२१७-नगर विकास ,१९१ महानगरपालिकांना सहाय(००)(२५) नागरी भागातील महानगरपालिका क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे(विशेष घटक योजना) (२२१७ ११४१) या लेखाशीर्षाखालील ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टामधून रु.१,००,००,०००/-(रुपये एक कोटी फक्त) इतक्या तरतूदीचे याच मुख्य लेखाशिर्षाखालील १९२-नगरपरिषदांना सहाय, (००)(६२)- नागरी भागातील नगरपरिषदा क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे(विशेष घटक योजना)(२२१७ ८०७५) या लेखाशीर्षाखालील ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टांखाली पुनर्विनियोजन करण्यात येत आहे. |
| | एकूण | १७६,११,२७ | १,००,००० | १७५,११,२७ | |

(शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. विघयो २०१४/ / प्र.क्र. ९५/ नवि-४, दि. २७.३.२०१५ चे सहपत्र)

विवरणपत्र क्र. २

वित्तीय वर्ष २०१४-१५ मधील अर्थसंकल्पीय अनुदानाचे पुनर्वितरण

(रूपये हजारात)

| अ.क्र. | पुनर्वितरणामुळे घट (-) झालेले लेखाशिर्ष (मुख्य/उप/गौण व तपशीलवार | पुनर्वितरणाचे वेळी उपलब्ध असलेले मंजूर अनुदान | पुनर्वितर णामध्ये घट होणारी रक्कम(-) | पुनर्वितरणा नंतर शिल्लक अनुदान | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| | मागणी क्र.एफ-२ मुख्य लेखाशीर्ष २२१७ नगर विकास, १९१- महानगरपालिकांना सहाय, (००)(२५) नागरी भागातील नगरपरिषदा क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे(विशेष घटक योजना) (२२१७ ८०७५) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) (दतमत) | १८२,०७,९७ | १,००,०० | १८३,०७,९७ | ना.द.व.सु.योजनेखाली महानगरपालिकांकरिता करण्यात आलेल्या तरतुदीपैकी रु.१ कोटी इतकी तरतूद यवतमाळ जिल्हयातील महानगरपालिकांसाठी आहे. यवतमाळ जिल्हयात महानगरपालिका नसल्यामुळे सदर तरतूद त्याच जिल्हयातील नगरपरिषदांसाठी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याकरिता मागणी क्र.एफ-२, मुख्य लेखाशीर्ष २२१७-नगर विकास ,१९१ महानगरपालिकांना सहाय(००)(२५) नागरी भागातील महानगरपालिका क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे(विशेष घटक योजना) (२२१७ ११४१) या लेखाशीर्षाखालील ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टामधून रु.१,००,००,०००/-(रुपये एक कोटी फक्त) इतक्या तरतूदीचे याच मुख्य लेखाशिर्षाखालील १९२- नगरपरिषदांना सहाय, (००)(६२)- नागरी भागातील नगरपरिषदा क्षेत्रातील दलित वस्त्यामध्ये सुविधा पुरविणे(विशेष घटक योजना)(२२१७ ८०७५) या लेखाशीर्षाखालील ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दिष्टाखाली पुनर्विनियोजन करण्यात येत आहे. |
| | एकूण | १८२,०७,९७ | १,००,०० | १८३,०७,९७ | |